लोक अदालतसमोर सुनावणीसाठी येणा-या
प्रकरणांना परिणामकारक गती देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एलएसवाय-२००९/५९५/प्र.क्र.१०८/का.२२**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : १८ ऑक्टोबर,२०१०.**

**वाचा :-** १) विधी सेवा प्राधिकरण अधिनियम,१९८७.
२) शासन निर्णय क्र.एलएनवाय-२००५/२७१/(प्र.क्र.१६)/का.२२,
दिनांक २४ ऑक्टोबर,२००५.

**प्रस्तावना :** शासनाने विधी सेवा प्राधिकरण अधिनियम,१९८७ च्या तरतुदीनुसार मोटार वाहन अपघात, भूसंपादन प्रकरणी उद्भवणारे दावे व इतर दाव्यांसाठी, दाव्या विषयक प्रकरणी त्वरेने व परिणामकारक असा अंतिम तोडगा निघावा या हेतुने स्थायी आणि अखंडीत लोक अदालतीची स्थापना केलेली आहे. त्यास अनुसरुन अ.नं.२ येथील दिनांक २४.१०.२००५ च्या शासन निर्णयानुसार प्राधिकृत अधिका-यांनी लोक अदालती समोरील तडजोडीकरीता कामे कशी करावी या संदर्भात तसेच त्यांना दिलेले अधिकार व कर्तव्य या संदर्भात निर्णय झालेला आहे.

दिनांक २४.१०.२००५ रोजीच्या शासन निर्णयामध्ये सूचना क्रमांक २ क,२ड, २इ२, २इ३, २इ४ व २इ५ या सूचना लोक अदालतीमध्ये तडजोड झालेनंतर शासन / विभाग प्रमुखांची तडजोडीस मान्यता मिळणेबाबतच्या आहेत. परंतु, विधी सेवा प्राधिकरण कायदा कलम २१ प्रमाणे लोक अदालतीसमोर एकदा तडजोड होउन त्यावर दोन्ही पक्षकारांच्या सहया झालेनंतर त्यास Decree चे स्वरुप प्राप्त होते व ती दोन्ही पक्षकारांवर बंधनकारक असते. त्यामुळे सदरील सूचना या कायदयाचे कलम २१ शी विसंगत आहेत. त्यामुळे दिनांक २४.१०.२००५ रोजीचे शासन निर्णयातील सूचना क्र.२ क, २ड, २इ२, २इ३, २इ४, २इ५ या वगळणे आवश्यक असलेने दिनांक २४.१०.२००५ रोजीचा शासन निर्णय रद्द करुन हे सुधारीत शासन निर्णय काढण्यात येत आहे.

२. शासन असे आदेश देत आहे की, लोक अदालतमध्ये दाखल करण्यात आलेल्या प्रकरणा संबंधात, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग तसेच त्यांच्या अधिपत्याखालील सर्व प्रशासकीय विभाग कार्यालये यांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

अ) लोक अदालतसमोर आलेल्या दाव्यांची पूर्ण जबाबदारी विभाग प्रमखाची असेल, विभाग प्रमुखांनी त्यांच्या अधिकाराखालील दाव्याची तडजोड करण्याकरीता सुयोग्य अधिका-यास प्राधिकृत करावे, असा अधिकारी राजपत्रित दर्जाचा असेल, प्राधिकृत अधिका-यांच्या नियुक्ती संदर्भात आवश्यक ते आदेश काढण्यात यावेत.

ब) दाव्या संदर्भात प्राधिकृत करण्यात आलेल्या अधिका-याने लोक अदालतसमोर हजर राहणे बंधनकारक असेल, गरज वाटल्यास त्याने अधिवक्त्याला बरोबर घ्यावे.

क) १) लोक अदालतसमोर ठेवण्यात आलेल्या प्रकरणांची संपूर्ण माहिती नियोजित तारखेपूर्वीच प्राधिकृत अधिका-याने विधी सेवा प्राधिकरणाच्या कार्यालयातून हस्तगत करुन

त्याबाबतचा सविस्तर अभ्यास करावा व त्या तारखेपूर्वी प्राधिकृत अधिका-याने त्या प्रकरणात विभाग प्रमुखाकडून / शासनाकडून कशा पध्दतीने, शासनाचे वतीने तडजोड मान्य करावी याची कार्यकक्षा ठरवून घ्यावी व सदरील कार्यकक्षेचे अधीन राहून लोक अदालतीचे दिवशी तडजोड घडवून आणण्याचा प्रयत्न करावा व तडजोड (Settlement) यशस्वी झालेनंतर त्याप्रमाणे लोकअदालतध्ये तडजोड पत्रावर स्वाक्षरी करावी. अशा पध्दतीने तडजोड केल्यानंतर त्यास पुन्हा विभाग प्रमुखाची / शासनाची मंजूरी घेण्याची आवश्यकता नाही व लोक अदालतसमोर झालेली तडजोड ही विधी सेवा प्राधिकरण कायदा कलम २१ अनुसार बंधनकारक राहील याची दखल घ्यावी.

क) २) लोक अदालतच्या मार्गदर्शनाखाली

(एक) लोक अदालतसमोर प्रकरणाची माहिती सादर करावी.

(दोन) लोक अदालतसमोर केलेल्या मागणी संदर्भात अंतिम तोडगा काढण्याचा किंवा अन्य प्रकारे तडजोड करण्याचा प्रयत्न करावा.

३. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी हे आदेश त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालये विभाग यांच्या तातडीने निदर्शनास आणावेत.

४. हा शासन निर्णय, सर्व प्रशासकीय, निमशासकीय कार्यालये, जिल्हा परिषदा व शासकीय महामंडळाने यांना लागू राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( एस.एस. शिंदे )
सॉलिसिटर-नि-सह सचिव

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई (पत्राने)
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई (पत्राने)
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ( २ प्रती)
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण, १०५. सार्वजनिक बांधकाम इमारत, उच्च न्यायालय,मुंबई - ४०० ०३२.
सदस्य सचिव, जिल्हा विधी सेवा समिती, उच्च न्यायालय, मुंबई यांची औरंगाबाद व नागपूर खंडपीठे
सर्व मंत्रालयीन विभाग,यांना माहितीसाठी व आवश्यक कार्यवाहीसाठी पाठविण्यात येत असून, त्यांना विनंती करण्यात येते की, हा शासन निर्णय त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयांच्या निदर्शनास आणून देण्यात यावा. ( उदा.राज्य शासकीय/निम शासकीय कार्यालये/स्थानिक स्वराज्य संस्था/महामंडळे इत्यादी)